**बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ अंतर्गत नोंदणी प्रमाणपत्र देणेबाबत सचिव स्तरीय समिती गठित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.जेजेए-२०१७ / प्र.क्र. ५३/का-८**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : १३ नोव्हेंबर, २०१८

**संदर्भ:** १.महाराष्ट्र राज्य बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) नियम, २०१८ नियम क्र.२२(१) ख
२.समक्रमांकाचे शासन पत्र दि. ५.४.२०१८ व दि. २७.४.२०१८ व परिपत्रक दि. ८मे, २०१८.

**प्रस्तावना:-**

१. महिला व बाल विकास विभागाकडून बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम,२०१५ च्या तरतूदींच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात येते. सदर अधिनियमाच्या कलम ४१ नुसार विधी संघर्षग्रस्त बालके आणि काळजी व संरक्षणाची गरज असलेली बालके यांना निवासी सेवा पुरविणा-या बालकांची काळजी घेणा-या संस्थांची (Child Care Institute) नोंदणी करणे आवश्यक करण्यात आले आहे. सदर नोंदणी प्रमाणपत्राचा वैधता कालावधी पाच वर्षे इतका असणार आहे.

२. सदर अधिनियमांतर्गत महाराष्ट्र राज्य बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण ) नियम, २०१८ दि १३.३.२०१८ च्या अधिसूचनेद्वारे अधिसूचित करण्यात आले आहेत. बाल न्याय अधिनियम २०१५च्या तरतूदीनुसार बाल न्याय अधिनियम ,२००० अंतर्गतचे नोंदणी प्रमाणपत्र बाल न्याय अधिनियम, २०१५ अंतर्गत ग्राह्य मानण्यात आले आहे.

३. राज्य शासनाच्या नियम, २०१८ च्या नियम २२(ख) मध्ये बाल न्याय अधिनियम,२०००/२००६ अंतर्गतच्या नोंदणी प्रमाणपत्राची वैधता ही नियम अधिसूचित केल्याच्या दिनांकापासून एक वर्षासाठी असेल अशी तरतूद असून त्यानंतर संस्थांना अधिनियम, २०१५ अंतर्गत नोंदणी प्रमाणपत्रासाठी अर्ज करणे आवश्यक करण्यात आले आहे. सदरची तरतूद विचारात घेऊन शासनाने बालकांची काळजी घेणा-या इच्छुक स्वयंसेवी संस्थांना नोंदणी प्रमाणपत्रासाठी अर्ज करणेबाबत वर्तमानपत्रातील जाहिरातीद्वारे आणि विभागाच्या संकेतस्थळावर याबाबत सूचित करण्यात आले होते. त्यानुसार आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांनी आवश्यक कागदपत्रांची पूर्तता केलेल्या संस्थांच्या अनुषंगाने अहवाल शासनास सादर करायचा असून सदर अहवालाच्या अनुषंगाने पुढील कार्यवाही करण्याकरिता सचिव स्तरीय समिती गठित करणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ च्या कलम,४१ अंतर्गत शासकीय व स्वयंसेवी संस्थांच्या नोंदणी प्रमाणपत्रासाठी प्राप्त अर्जाच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यासाठी पुढीलप्रमाणे त्रिसदस्यीय सचिव समिती गठित करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| (१) सचिव, महिला व बाल विकास विभाग. | अध्यक्ष |
| (२) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग . | सदस्य |
| (३) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग. | सदस्य |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११३१५५७०७८९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Pratibha Sanjay Chaudhari

Digitally signed by Pratibha Sanjay Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b473b4ee37ba1cee5a359333e2009303b170cfa656f3ab1231d2ba1fbf6e04cf, cn=Pratibha Sanjay Chaudhari
Date: 2018.11.13 16:00:31 +05'30'

**(प्रतिभा चौधरी)**
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रत**

१. मा.राज्यपाल, यांचे सचिव,राजभवन,मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई .
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ. मुंबई .
४. मा.सभापती/उपसभापती विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ. मुंबई .
५. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/ विधानपरिषद,महाराष्ट्र विधीमंडळ.
६. मा.मंत्री (म व बा वि)/ राज्यमंत्री(म व बा वि),यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय ,मुंबई .
७. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई
८. सचिव, आदिवासी विकास विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
९. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.सचिव, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
११.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२.प्रधान सचिव (व्यय),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१३.प्रधान सचिव (ले व को),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१४.आयुक्त , महिला व बाल विकास , महिला व बाल विकास आयुक्तालय,म.रा. पुणे.
१५.उप आयुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६.कार्यक्रम व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण सोसायटी, पुणे.
१७.सर्व उपसचिव ,सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास. नवीन प्रशासकीय भवन , मुंबई
१८. उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
१९.उपसचिव, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
२०.उपायुक्त (बालविकास) महिला व बाल विकास आयुक्तालय, म.रा.पुणे.
२१.वित्त विभाग (व्यय-६/अर्थसंकल्प-७), नियोजन विभाग (का-१४७२) मंत्रालय,मुंबई -३२,
२२.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
२३.सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन , मुंबई
२४.निवड नस्ती का-८